संगणक सांकेतांक क्र
२०११११२१३११४११५४६०१

**राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धांमधील सहभागामुळे राज्य शासकीय कर्मचारी यांना द्यावयाच्या अतिरिक्त वेतनवाढ/वेतनवाढी व अनुपस्थितीचा कालावधी नियमित करण्याबाबत खुलासा.**

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्र. एलव्हीई १४०४/प्र.क्र.८/सेवा-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:२७ फेब्रुवारी २००४

संदर्भ :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३-अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९.

**शासन निर्णय** :-

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धेत भाग घेऊन विशेष प्राविण्य मिळविणा-या राज्य शासकीय कर्मचा-यास आर्थिक प्रोत्साहन व सवलती मंजूर करण्याच्या संदर्भात शासन खालीलप्रमाणे खुलासा करीत आहे.

| | मुद्दा | खुलासा |
|---|---|---|
| १ | शासनाने निवडलेल्या/ नियुक्त केलेल्या कर्मचा-यांपुरतेच दिनांक ११ मे, १९८९ चे आदेश सिमित आहेत किंवा कसे. | राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धेत भाग घेणा-या, त्याकरिता शासनाने नियुक्त(Depute) वा निवड केलेल्या कर्मचा-यांसाठीच नव्हे तर सर्व कर्मचा-यांसाठी हे आदेश लागू आहेत. |
| २ | शासनाने आंतरराष्ट्रीय खेळस्पर्धेत सहभागासाठी परवानगी नाकारली असताना सहभाग घेणा-या कर्मचा-यास दि.११.५.८९ च्या आदेशातील तरतूदी लागू होतात किंवा कसे | ज्या आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धांसाठी आवश्यक त्या परिमाणाची (standard) पूर्तता होत नसल्यामुळे वा अन्य कारणास्तव शासनाने खेळ स्पर्धेतील सहभागासाठी परवानगी नाकारली असेल व तरीदेखील संबंधित खेळ प्राधिकरण वा संस्थांनी अशा स्पर्धेत भाग घेतला तर ते शासनाच्या धोरणाविरुध्द ठरेल. म्हणून केवळ शासनाने परवानगी/मान्यता दिलेल्या संघास वा खेळाडूस या निर्णयातील तरतूदी लागू राहतील अन्यथा नाही. |
| ३ | 'अतिप्राविण्य' शब्दाची व्याख्या कोणती? | खेळातील अतिप्राविण्य म्हणजे व्यायामाचे खेळ प्रकारातील (Athletics) १ ला, २ रा व ३ रा क्रमांक व इतर क्रिडा प्रकारातील फक्त पहिला क्रमांक. |
| ४ | राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धेतील विजयी संघातील सर्व खेळाडूंना अतिरिक्त वेतनवाढी अनुज्ञेय आहेत किंवा कसे? | राष्ट्रीय खेळ स्पर्धेत विजयी संघात प्रत्यक्ष सहभाग असणारे खेळाडू अतिरिक्त वेतनवाढीस पात्र ठरतात. त्या संघातील इतर राखीव खेळाडूंना अतिरिक्त वेतनवाढ अनुज्ञेय नाही. |

रोटा प्रिंट/एच–1117(18000+50–2–04)1

| | | |
|---|---|---|
| ५ | संघातील प्रशासक/ प्रशिक्षक/ व्यवस्थापक / डॉक्टर यांना दिनांक ११ मे, १९८९ च्या तरतूदी लागू होतात किंवा कसे? | प्रशासक/प्रशिक्षक/व्यवस्थापक/डॉक्टर हे संघाचा घटक समजून त्यांना दि.११ मे १९८९ च्या तरतूदी लागू ठरतील. तथापि, शासन पुरस्कृत संघातील प्रशासक/ प्रशिक्षक/ व्यवस्थापक/ डॉक्टर यांना अतिरिक्त वेतनवाढ मंजूर करण्याबाबत गुणवत्तेनुसार व प्रकरणपरत्वे विचार करण्यात येईल. मात्र, तांत्रिक पदधारकांना या सवलतींपैकी केवळ 'विशेष नैमित्तिक रजा' अनुज्ञेय राहील. |
| ६ | दि.११ मे, १९८९ च्या आदेशानुसार अनुज्ञेय वेतनवाढ/ वेतनवाढीवर महागाईभत्ता व घरभाडेभत्ता देय आहे किंवा कसे. | राष्ट्रीय वा आंतरराष्ट्रीय खेळामध्ये अतिप्राविण्य मिळविणा-या कर्मचा-यास मंजूर करण्यात आलेल्या अतिरिक्त वेतनवाढी त्यांच्या नियमित वेतनवाढीत समाविष्ट करावयाच्या नसून त्या स्वतंत्रपणे वेगळया दाखविणे आवश्यक आहे. या वेतनवाढीवर महागाईभत्ता व घरभाडेभत्ता अनुज्ञेय नाही. अशाप्रकारे दिलेल्या अतिरिक्त वेतनवाढ/वेतनवाढी संबंधित शासकीय कर्मचारी सेवानिवृत्त होईपर्यंत त्याच दराने दिल्या जातील आणि त्या सेवानिवृत्तीच्या लाभाकरिता विचारात घेण्यात येतील. पदोन्नतीनंतर होणा-या वेतन-निश्चितीसाठी या वेतनवाढी विचारात घेता येणार नाहीत. |
| ७ | विकलांग(Handicapped), अंध(Blind), मूक/बधिर (Deaf / Dumb), खेळाडू वा वैयक्तिक विक्रम(Outstanding individual feat) करणा-या कर्मचा-यास अतिरिक्त वेतनवाढ /वेतनवाढी व विशेष नैमित्तिक रजा देय ठरतात किंवा कसे? | अंध/विकलांग व मूकबधिर खेळाडू (Blinds, Physically handicapped, Deaf sport persons) व खेळातील वैयक्तिक विक्रम करणा-या कर्मचा-यास अतिरिक्त वेतनवाढ/ वेतनवाढी अनुज्ञेय नाहीत. मात्र, शासनाने आयोजित केलेल्या खेळ स्पर्धेकरिता व शासन नियुक्त/प्राधिकृत वा निवड केलेल्या अपंग कर्मचा-यास अशा खेळ स्पर्धेत सहभागी होण्याकरिता १० दिवसांची विशेष नैमित्तिक रजा अनुज्ञेय आहे. |
| ८ | केंद्र वा राज्य शासनाने आयोजित केलेल्या राष्ट्रीय/ आंतरराष्ट्रीय स्तरावरील नृत्य/ गायन वा आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक कार्यक्रमात भाग घेणा-या शासकीय कर्मचा-यास 'विशेष नैमित्तिक रजा' देय ठरते किंवा कसे. | केंद्र शासन/राज्य शासन/शासन पुरस्कृत संस्था (Government sponsored bodies)/ संघटना/महासंघ/खेळ मंडळ यांनी आयोजित केलेल्या नृत्य व गायनाच्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय कार्यक्रमासाठी १५ दिवस 'विशेष नैमित्तिक रजा' अनुज्ञेय ठरविण्यात येत आहे. ही सवलत आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक कार्यक्रमासाठी (International Cultural events such as Festival of India, abroad) देखील देय आहे. मात्र, अशा कार्यक्रमाची पूर्वतयारी/सराव करण्यासाठी रजा अनुज्ञेय नाही. तसेच, शासन पुरस्कृत संस्था/संघटना/महासंघ म्हणजे ज्यांना शासनाकडून भरीव सहायक अनुदान मिळते अशा संस्था होय. |
| ९ | दि.११मे,१९८९च्या आदेशानुसार Veterans व अपंग लाभार्थी ठरतात किंवा कसे? | Veterans meet करिता विचाराधीन आदेशाच्या तरतूदी लागू नाहीत. |
| १० | गिर्यारोहण मोहिम लांबल्यास ३० दिवसांपेक्षा अधिक विशेष नैमित्तिक रजा अनुज्ञेय ठरते किंवा कसे? | भारतीय युवक हॉस्टेल्स द्वारे आयोजित व भारतीय पर्वतीरोहण संघाची मान्यता मिळालेल्या गिर्यारोहण मोहिमेकरिता ३० दिवसांची विशेष नैमित्तिक रजा मंजूर करता येईल. तथापि, अशी मोहिम लांबल्यास संबंधित कर्मचा-यास ३० दिवसांच्या विशेष नैमित्तिक रजेस जोडून म.ना.से.(रजा) नियम,१९८१ च्या तरतूदीनुसार देय/अनुज्ञेय रजा मंजूर करण्यात यावी. |

| | | |
|---|---|---|
| ११ | Shooting ball च्या खेळात अतिप्राविण्य मिळविलेल्या कर्मचा-यास दि.११.५.८९ च्या आदेशातील तरतूदी अनुज्ञेय ठरतात किंवा कसे? | Shooting ball च्या खेळास Volley Ball समजण्यात येऊ नये. हा वेगळा क्रिडा प्रकार असून ह्या खेळाअंतर्गत येणारा खेळाडू दि.११.५.८९ च्या सवलतीस पात्र नाही. |
| १२ | कोणत्या खेळ स्पर्धेसाठी दि.११.५.८९ च्या तरतूदी लागू होतात. | सोबत, मान्यताप्राप्त खेळ स्पर्धेची यादी जोडली आहे. |

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शुभदा कारेकर
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई (८० प्रती),
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर (८० प्रती),
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई (४० प्रती),
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर (४० प्रती),
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा), मुंबई ,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (४० प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल ५ प्रती),
निवड नस्ती - कार्यासन सेवा-८.वित्त विभाग.

---

* पत्राने.

एच-1117(18000+50-2-04)2

**शासन निर्णय क्र.एलव्हीई १४०४/प्र.क्र.८/सेवा ८, दिनांक २७ फेब्रुवारी २००४ मधील अनुक्रमांक १२ संदर्भातील मान्यताप्राप्त खेळांची यादी.**

1. Archery
2. Atya-Patya
3. Ball-Badminton
4. Billiards and Snooker
5. Bridge
6. Chess
7. Cycling
8. Football
9. Gymnastics(including body building)
10. Hockey
11. Kabaddi
12. Kayaking and Canoeing
13. Polo
14. Rifle Shooting
15. Rowing
16. Squash
17. Table Tennis
18. Tenni-Koit
19. Volleyball
20. Wrestling
21. Athletics (including Track and Field events)
22. Badminton
23. Basketball
24. Boxing
25. Carrom
26. Cricket
27. Equestrian Sports
28. Golf
29. Handball
30. Judo
31. Karate -DO
32. Kho-Kho
33. Powerlifting
34. Skating
35. Softball
36. Swimming
37. Taekwondo
38. Tennis
39. Weight Lifting
40. Yatching

---

एच-1117(18000+50-2-04)2अ.